कृषि विभागाच्या अधिपत्याखाली राबविण्यात येणा-या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्य योजना सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) या संगणक प्रणालीद्वारे राबविण्यासाठी बँक खाती उघडण्यास परवानगी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/भाग-१/२-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: २७ जून, २०१८

**संदर्भ:**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक - पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/२-अे, दिनांक २७ सप्टेंबर, २०१७
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक - पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/२-अे, दिनांक २९ सप्टेंबर, २०१७
३. कृषि व पदुम विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक ९ नोव्हेंबर, २०१७

**प्रस्तावना :**

कृषि विभागाच्या अधिपत्याखाली राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजना PFMS प्रणालीव्दारे राबविण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये या योजनांसाठी जिल्हा अधिक्षक कृषि कार्यालयातील लेखाअधिकारी / अधिक्षक यांना मेकर व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / प्रकल्प संचालक (आत्मा) यांचेवर चेकरची जबाबदारी सोपविण्यात आलेली आहे. सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली राबविताना येणा-या विविध अडचणी विचारात घेऊन पीएफएमएस प्रणालीमधील मेकरची भूमिका तालुका कृषि अधिकारी यांच्यावर व असिस्टंट चेकरची भूमिका लेखाधिकारी यांच्यावर तसेच मुख्य चेकरची भूमिका जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / प्रकल्प संचालक (आत्मा) यांच्यावर सोपविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:

कृषी विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजना PFMS प्रणालीव्दारे राबविण्यासाठी तालुका कृषि अधिकारी हे मेकर (Maker) असतील व जिल्हा अधिक्षक कृषि कार्यालयातील लेखाधिकारी / अधिक्षक हे असिस्टंट चेकर (Assistant checker) तसेच जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / प्रकल्प संचालक (आत्मा) हे अंतिम चेकर (Final Checker) असतील.

२. सदर शासन निर्णय संदर्भाधिन शासन निर्णयांन्वये दिलेल्या सूचना आणि अटी व शर्तीची पूर्तता करण्याच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२७१५०११९१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakumar Vithal Ghaytadak

Digitally signed by Chandrakumar Vithal Ghaytadak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=034948ccd1f6b6c67380c817b34a9af75fcfa679a4609321f9da27d9ab87b0d1, cn=Chandrakumar Vithal Ghaytadak
Date: 2018.06.27 15:07:00 +05'30'

**(चं. वि. घायतडक)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१ अपर मुख्यसचिव ( कृषि ) कृषि, व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२ कृषि आयुक्त , महाराष्ट्र राज्य, पुणे
३ संचालक ( सर्व ) कृषि आयुक्तालय, पुणे
४ कृषि सहसंचालक (सर्व) कृषि आयुक्तालय, म.रा. पुणे
५ संचालक ( लेखा व कोषागारे) मुंबई,
६ सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालय, मुंबई
७ सर्व विभागीय कृषि सहसंचालक/ जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी (सर्व) /तालुका कृषि अधिकारी (सर्व )
८ महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर
९ सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१० सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे
११ वित्त विभाग (व्यय - २ / अर्थ - १३/ कोषा प्रशा-५) मंत्रालय,मुंबई
१२ लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे
१३ श्री. सुनिल मोने, तज्ञ वरिष्ठ वित्तिय सल्लागार, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४ श्री. संदीप उके, सहाय्यक राज्य नोडल अधिकारी, पीएफएमएस.
१५ उप महाप्रबंधक, डिजिटल आणि लेणदेण बँकींग शासकिय व्यावसायिक विभाग, सायनरजी सी-६ / जी ब्लॉक बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा पूर्व मुंबई- ४०० ०५१.
१६ निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).